रजिस्टर्ड नं. एमएच/एमआर/साऊथ-२२९/२००६-०८


# महाराष्ट्र शासन राजपत्र

**प्राधिकृत प्रकाशन**

**गुरुवार, मे ८, २००८/वैशाख १८, शके १९३०**


# भाग चार-अ

**महाराष्ट्र शासनाने केंद्रीय अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

## सामान्य प्रशासन विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ११ एप्रिल २००८

**अधिसूचना**

**भारताचे संविधान.**

क्रमांक सीडीआर. १००७/प्र.क्र. १३/०७/११.— भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३०९ च्या परंतुकाद्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्राचे राज्यपाल याद्वारे महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी पुढीलप्रमाणे नियम करीत आहेत :—

१. या नियमांना महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) (सुधारणा) नियम, २००८ असे म्हणण्यात यावे.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ (यापुढे ' मूळ नियम ' असे निर्देशित करण्यात आले आहे) च्या नियम २ मधील खंड (ड), (इ), (फ) व (ग) यांऐवजी पुढील खंड समाविष्ट करण्यात येतील :—

" (ड) " गट ' ड ' ची पदे " याचा अर्थ, गट ' ड ' ची पदे म्हणून विनिर्दिष्ट केलेली पदे, आणि ज्यांचे कमाल वेतन रु. ४,४०० इतके किंवा त्याहून कमी आहे किंवा भविष्यात वेळोवेळी करण्यात आलेल्या वेतनश्रेणीच्या पुनर्रचनेशी सुसंगत रकमे इतके असेल अशी वर्गीकृत न केलेली अराजपत्रित पदे असा आहे ;

(इ) " गट ' क ' ची पदे " याचा अर्थ, गट ' ड ' च्या पदांहून अन्य अशी सर्व अराजपत्रित पदे असा आहे ;

(फ) " गट ' ब ' ची पदे " याचा अर्थ, गट ' अ ' च्या पदांहून अन्य सर्व राजपत्रित पदे असा आहे ;

(ग) " गट ' अ ' ची पदे " याचा अर्थ, गट ' अ ' च्या सेवेत विनिर्दिष्टपणे समाविष्ट केलेली सर्व राजपत्रित पदे आणि ज्यांचे कमाल वेतन रु. ११,५०० किंवा भविष्यात वेळोवेळी करण्यात आलेल्या वेतनश्रेणीच्या पुनर्रचनेशी सुसंगत रकमेइतके असेल अशी वर्गीकृत न केलेली पदे असा आहे. ".

३. मूळ नियमाच्या नियम १२ मधील,—

(अ) पोटनियम (२) मध्ये खंड (एक), (दोन) व (तीन) ऐवजी पुढील खंड समाविष्ट करण्यात येतील :—

" (एक) गट ' अ ' चे कोणतेही पद धारण करणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्याच्या बाबतीत रुपये ७,००० पेक्षा ;

(दोन) गट ' ब ' चे कोणतेही पद धारण करणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्याच्या बाबतीत रुपये ४,००० पेक्षा ;

(तीन) गट ' क ' चे कोणतेही पद धारण करणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्याच्या बाबतीत रुपये २,००० पेक्षा ; आणि

(चार) गट ' ड ' चे कोणतेही पद धारण करणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्याच्या बाबतीत रुपये १,००० पेक्षा. " ;

(ब) पोटनियम (३) मध्ये खंड (एक), (दोन) व (तीन) ऐवजी पुढील खंड समाविष्ट करण्यात येतील :—

" (एक) गट ' अ ' किंवा गट ' ब ' चे कोणतेही पद धारण करणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्याच्या बाबतीत रुपये १,५०० ;

(दोन) गट ' क ' चे कोणतेही पद धारण करणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्याच्या बाबतीत रुपये १,००० ; आणि

(तीन) गट ' ड ' चे कोणतेही पद धारण करणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्याच्या बाबतीत रुपये ५००. " ;

(क) पोटनियम (४) मध्ये खंड (एक) व (दोन) या ऐवजी पुढील खंड समाविष्ट करण्यात येतील :—

" (एक) गट ' अ ' किंवा गट ' ब ' चे कोणतेही पद धारण करणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्याच्या बाबतीत रुपये १,००० ; आणि

(दोन) गट ' क ' किंवा गट ' ड ' चे कोणतेही पद धारण करणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्याच्या बाबतीत रुपये ५००. ".

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**प्र. ल. पाठक,**

शासनाचे उप सचिव.

क्रमांक सीडीआर. १००७/प्र.क्र. १३/०७/११,
**सामान्य प्रशासन विभाग**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक ११ एप्रिल २००८

प्रत,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.

---

* पत्राने

**का. तु. सातकर,**
शासनाचे अवर सचिव.

# GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 11th April 2008

*NOTIFICATION*

CONSTITUTION OF INDIA.

No. CDR1007/CR.-13/07/11.—In exercise of the powers conferred by the proviso to article 309 of the Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules further to amend the Maharashtra Civil Services (Conduct) Rules, 1979, namely :—

1. These rules may be called the Maharashtra Civil Services (Conduct) (Amendment) Rules, 2008.

2. In Rule 2 of the Maharashtra Civil Services (Conduct) Rules, 1979 (hereinafter referred to as " the principal Rules "), for clauses (*d*), (*e*), (*f*) and (*g*) the following clauses shall be substituted, namely :—

" (*d*) ' Group D Posts ' means posts which are specifically classified as Group D posts and such other unclassified non-gazetted posts the maxima of the scales of which are equal to or less than Rs. 4,400 or a corresponding amount as per the revision of pay scales made, from time to time, in future ;

(*e*) ' Group C Posts ' means all non-gazetted posts other than Group D posts ;

(*f*) ' Group B Posts ' means all gazetted posts other than Group A posts ;

(*g*) ' Group A Posts ' means all gazetted posts which are specifically included in Group A Service and those unclassified posts the maxima of the scales of which are Rs. 11,500 or a corresponding amount as per the revision of pay scales made, from time to time, in future. ".

3. In rule 12 of the principal Rules,—

(*a*) in sub-rule (*2*), for clauses (*i*), (*ii*) and (*iii*), the following clauses shall be substituted, namely :—

" (*i*) Rs. 7,000 in the case of the Government servant holding any Group 'A' post ;

(*ii*) Rs. 4,000 in the case of the Government servant holding any Group 'B' post ;

(*iii*) Rs. 2,000 in the case of the Government servant holding any Group 'C' post ; and

(*iv*) Rs. 1,000 in the case of the Government servant holding any Group 'D' post. " ;

(*b*) in sub-rule (*3*), for clauses (*i*), (*ii*) and (*iii*), the following clauses shall be substituted, namely :—

" (*i*) Rs. 1,500 in the case of the Government servant holding any Group 'A' or Group 'B' post ;

(*ii*) Rs. 1,000 in the case of the Government servant holding any Group 'C' post ; and

(*iii*) Rs. 500 in the case of the Government servant holding any Group 'D' post. " ;

(*c*) in sub-rule (*4*), for clauses (*i*) and (*ii*), the following clauses shall be substituted, namely :—

" (*i*) Rs. 1,000 in the case of the Government servant holding any Group 'A' or Group 'B' post ; and

(*ii*) Rs. 500 in the case of the Government servant holding any Group 'C' post or Group 'D' post. ".

By order and in the name of the Governor of Maharashtra,

P. L. PATHAK,
Deputy Secretary to Government.

No. CDR. 1007/CR-13/07/XI,
GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Mantralaya, Mumbai 400 032,
dated the 11th April 2008.

Copy forwarded with compliments for information to :—

The Secretary to the Governor,

The Principal Secretary to the Chief Minister,

The Principal Secretary to the Deputy Chief Minister,

The Private Secretaries to all Ministers,

The Personal Assistants to all Ministers of State,

All Additional Chief Secretaries/Principal Secretaries/Secretaries to Government of Maharashtra,

* Prothonotary and Sr. Master, High Court (Original Side), Mumbai,

* The Registrar, High Court, Appelate Side, Mumbai,

* The Registrar, Office of the Lokayukta and Upa Lokayukta, Mumbai,

* The Secretary, Maharashtra Legislature Secretariat, Mumbai,

* The Secretary, Maharashtra Public Service Commission, Mumbai,

* The Secretary, State Election Commission, Mumbai,

All Other Departments of the Mantralaya, Mumbai,

The General Administration Department (All Desks),

All Other Heads of Departments and Heads of Offices under several Departments of the Mantralaya.

---

* By Letter

K. T. SATKAR,
Under Secretary to Government.